राज्य शासकीय कर्मचाऱ्यांना व इतरांना
सुधारित दराने घरभाडेभत्ता देण्याबाबत.

महाराष्ट्र शासन,
वित्त विभाग,
शासन निर्णय क्रमांक घभाभ-१०९०/प्र.क्र.१०/सेवा-५,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२, दिनांक ५ फेब्रुवारी १९९०.

वाचा :- [१] शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक सीपीजे १४७८/सीआर-२५१/एसईआर-५, दिनांक १७ एप्रिल १९७८.

[२] शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक सीपीजे १४८०/सीआर-२३२/एसईआर-५, दिनांक १५ मार्च १९८०.

[३] शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक वेपुर १२८७/६४३/सेवा-१०, दिनांक २५ एप्रिल १९८८.

## शासन निर्णय

शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक वेपुर-१२८७/६४३/सेवा-१०, दिनांक २५ एप्रिल १९८८ अन्वये राज्य शासकीय कर्मचाऱ्यांना व इतरांना दिनांक १ एप्रिल १९८८ पासून घरभाडेभत्त्याचे दर निश्चित करण्यात आलेले आहेत. राज्य शासकीय कर्मचारी व इतर यांना घरभाडेभत्ता केंद्र शासनाच्या दराप्रमाणे देण्यात यावा ही मागणी शासनाच्या विचाराधीन होती. शासनाने आता निर्णय घेतला आहे की, राज्य शासनाचे, जिल्हा परिषदांचे व शासन अनुदान प्राप्त संस्थेचे जे कर्मचारी त्यांच्या शासकीय आदेशानुसार घरभाडेभत्ता मिळण्यास पात्र आहेत, त्यांना मिळणारा घरभाडेभत्ता केंद्र शासनाच्या तत्सम कर्मचाऱ्यांना अनुज्ञेय असलेल्या दराने खाली परिच्छेद २ मधील तक्त्यात नमूद केलेल्या दिनांकापासून मंजूर करण्यात यावा.

२. शासन असा आदेश देत आहे की, राज्य शासकीय कर्मचाऱ्यांना अनुज्ञेय असलेल्या घरभाडेभत्त्याचे दर शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक वेपुर १२८७/६४३/सेवा-१०, दिनांक २५ एप्रिल १९८८ मधील परिशिष्ट १-ब मध्ये नमूद केलेल्या शहरांच्या वर्गीकरणानुसार खालील दिलेल्या तक्त्याप्रमाणे व त्यात नमूद केलेल्या दिनांकापासून सुधारण्यात यावेत:-

### तक्ता

| वेतनमर्यादा | घरभाडेभत्त्याची मासिक रक्कम, शहराचे वर्गीकरण व अंमलबजावणीचा दिनांक | | |
|---|---|---|---|
| | "अ", "ब-१" व "ब-२" वर्गाची शहरे दिनांक १ ऑक्टोबर १९९० पासून | अन्य जिल्हा मुख्यालये व "क" वर्गाची शहरे दिनांक १ एप्रिल १९९० पासून | इतर ठिकाणे दिनांक १ जानेवारी १९९० पासून |
| [१] | [२] | [३] | [४] |
| रुपये | रुपये | रुपये | रुपये |
| ७५०—९४९ पर्यन्त | १५० | ७० | ३० |
| ९५०-१४९९ पर्यन्त | २५० | १२० | ५० |
| १५००-२७९९ पर्यन्त | ४५० | २२० | १०० |
| २८००-३५९९ पर्यन्त | ६०० | ३०० | १५० |
| ३६००-४४९९ पर्यन्त | ८०० | ४०० | २०० |
| ४५०० - व अधिक | १००० | ५०० | ३०० |

३. ह्या आदेशांच्या प्रयोजनासाठी 'वेतन' म्हणजे महाराष्ट्र नागरी सेवा[वेतन] नियम, १९८१ मधील नियम ९[ ३६ ][ ८ ] मध्ये व्याख्या केल्याप्रमाणे अनुज्ञेय असलेले वेतन असेल. जे कर्मचारी जर असुधारित वेतनश्रेणीमध्ये वेतन घेत असतील तर त्यांच्या बाबतीत घरभाडेभत्त्याची रक्कम परिगणित करताना त्यांचे दिनांक १ जानेवारी १९८६ चे असुधारित वेतनश्रेणीतील मूळ वेतन व त्यावर १ जानेवारी १९८६ रोजी अनुज्ञेय असलेला महागाई भत्ता व तदर्थ महागाई भत्ता [मिळत असल्यास] आणि अंतरिम वाढ १ व २ आणि २० टक्के तदर्थ वाढ [किमान रू. ७५/-][जर ते आजतागायत घेत असतील तर] मिळून होणारी एकूण रक्कम विचारात घेण्यात यावी.

"टीप. - सुधारित वेतनश्रेणीत, महाराष्ट्र नागरी सेवा[सुधारित वेतन]नियम, १९८८ अन्वये मंजूर करण्यात आलेल्या वेतनोत्तर वेतनवाढी[Stagnation Increments ] व तदर्थ वेतनवाढी[Ad-hoc-Increments ] घरभाडे भत्ता व स्थानिक पूरक भत्ता देण्याच्या प्रयोजनासाठी मूळ वेतनाचा भाग समजण्यात याव्यात."

४. सर्व कर्मचा-यांना[शासनाच्या मालकीच्या/शासनाने भाड्याने घेतलेल्या निवासस्थानात राहणा-या व्यतिरिक्त] भाडे पावती सादर न करता वरील दराने घरभाडेभत्ता देय असेल. तथापि, ह्या कर्मचा-यांना ते घरभाड्यासाठी काही खर्च/घरभाड्यापोटी अंशदान करीत आहेत अशा आशयाचे प्रमाणपत्र शासन निर्णय, वित्त विभाग क्रमांक वेपुर-१२८७/६४३/सेवा-१०, दिनांक २५ एप्रिल १९८८ अन्वये विहित केलेल्या जोडपत्र-२ प्रमाणे प्रस्तुत करावे लागेल. स्वत:च्या मालकीच्या घरात राहाणा-या कर्मचा-यांना देखील, त्यांनी सदरहू आदेशासोबतच्या जोडपत्र-२ प्रमाणे प्रमाणपत्र सादर केल्यास घरभाडेभत्ता दिला जाईल. कर्मचा-यांना ही प्रमाणपत्रे प्रत्येक वर्षी एप्रिल महिन्यात किंवा ज्यावेळी प्रमाणपत्रातील मजकुरात बदल झाला असेल तेव्हा सादर करावी लागतील. ह्याशिवाय घरभाडेभत्ता देण्यासंबंधीच्या सध्याच्या इतर सर्व शर्ती तशाच लागू राहतील. ग्रामीण भागातील कर्मचा-यांच्या बाबतीत, कामाच्या ठिकाणी राहण्याच्या संबंधात, घरभाडेभत्त्याच्या पात्रतेसाठी विहित केलेली शर्त मात्र काढून टाकण्यात येत आहे.

५. जे कर्मचारी, त्यांच्या सेवाशर्तीनुसार, भाडेमाफ निवासस्थान मिळण्यास पात्र आहेत आणि ज्यांना निवासस्थाने पुरविण्यात आलेली नाहीत, असे कर्मचारी, वर उल्लेखिलेल्या क्र. [२] च्या आदेशानुसार भाडेमाफ निवासस्थानाऐवजी घरभाडेभत्त्याची मागणी करण्यात पात्र आहेत, असे कर्मचारी घरभाडेभत्त्याचे सुधारित दर अधिक त्यांच्या सध्याच्या वेतनाच्या म्हणजेच असुधारित वेतनश्रेणीतील वेतनाच्या व स्थानिक पूरक भत्त्याच्या १० टक्के, ह्या आधारे भाडेमाफ निवासस्थानाऐवजी घरभाडेभत्ता मिळण्यास पात्र असतील. परंतु भाडेमाफ निवासस्थानाऐवजी घरभाडेभत्त्याची मागणी करण्यासाठी विहित केलेल्या सर्व अटी पूर्ण कराव्या लागतील.

६. शासन असाही आदेश देत आहे की, सर्व अनुदानप्राप्त शैक्षणिक संस्थांच्या प्राथमिक, माध्यमिक शाळांतील पूर्णकालिक शिक्षक व शिक्षकेतर कर्मचारी, तसेच कृषि व कृषीतर विद्यापीठांतील व तत्संलग्न महाविद्यालयांतील शिक्षक व शिक्षकेतर कर्मचारी, त्याचप्रमाणे शासन निर्णय, वित्त विभाग क्रमांक मभवा-११८६/३९४/सेवा-१०, दिनांक १८ ऑगस्ट १९८६ मधील परिच्छेद ६ मध्ये उल्लेखिलेले इतर कर्मचारी ह्यांना सध्याची घरभाडेभत्त्याची योजना लागू असल्यास, त्यांना वरील परिच्छेद २ मधील घरभाडेभत्त्याचे सुधारित दर, वरील परिच्छेद ४ मधील तरतुदींसह अनुज्ञेय असतील.

७. महाराष्ट्र जिल्हा परिषदा व पंचायत समित्या अधिनियम, १९६१ [सन १९६२ चा अधिनियम, क्रमांक ५] च्या कलम २४८ च्या परंतुकान्वये प्रदान केलेले अधिकार व त्यासंबंधातील इतर सर्व अधिकार यांचा वापर करून शासन असाही आदेश देत आहे की, जिल्हा परिषदांच्या पूर्णकालिक कर्मचाऱ्यांनासुध्दा हे आदेश योग्य त्या फेरफारांसह लागू करण्यात यावेत.

८. शासन असाही आदेश देत आहे की, विद्यापीठ अनुदान आयोगाच्या वेतनमानानुसार वेतन घेणाऱ्या शिक्षक व शिक्षकेतर कर्मचाऱ्यांनाही, हे आदेश लागू करण्यात यावेत.

९. संबंधित विभागीय प्रमुखांनी, सदरहू आदेश, स्थानिक संस्थांच्या आणि सर्व संबंधित संस्थांच्या व्यवस्थापनांच्या निदर्शनास आणून द्यावेत आणि कर्मचाऱ्यांना सुधारित दराने घरभाडेभत्ता दिला जाईल याची खात्री करून घ्यावी. शासनाने वेळोवेळी मंजूर केलेल्या सहायक अनुदान नियमांनुसार या भत्त्यासाठी सहायक अनुदान अनुज्ञेय होईल असे त्यांनी व्यवस्थापनांना कळवावे.

१०. शासकीय कर्मचाऱ्यांच्या बाबतीत घरभाडेभत्त्याचे सध्याचे दर व सुधारित दर यामधील फरकाचा खर्च, "मागणी क्रमांक: जी–८–२०७०, इतर प्रशासनिक सेवा–८००, इतर खर्च– [सहा] वेतन, घरभाडेभत्ता व स्थानिक पूरक भत्ता यांच्यात सुधारणा झाल्यामुळे त्यासाठीची ठोक तरतूद", या शीर्षाखाली, शासकीय ज्ञापन, वित्त विभाग, क्रमांक आकनि–११९०/२४६/अर्थसंकल्प–७, दिनांक ३ फेब्रुवारी १९९० अन्वये मंजूर केलेल्या रु. ५४ लाख आकस्मिकता निधी अग्रिमातून करण्यात यावा. आहरण व संवितरण अधिकाऱ्यांनी, घरभाडेभत्त्याचे सध्याचे दर व सुधारित दर यामधील फरकाच्या रकमेची स्वतंत्र देयके तयार करावीत व सदर खर्च आकस्मिकता निधी अग्रिमातून करावा आणि त्याचबरोबर, सदर खर्च, अग्रिमाच्या प्रतिपूर्तीनंतर, शेवटी कोणत्या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकावयाचा हे सूचित करावे. ही पध्दती, फेब्रुवारी १९९० ची मासिक वेतन [दिनांक १ मार्च १९९० रोजी अथवा त्यानंतर दिले जाणारे] देयके काढीपर्यन्त अवलंबण्यात यावी. त्यानंतर घरभाडेभत्त्याच्या सुधारित दरांचा समावेश नियमित मासिक वेतन देयकात करण्यात यावा आणि त्याचा खर्च संबंधित कार्यात्मक प्रमुख लेखाशीर्षाखाली खर्ची घालण्यात यावा. नियंत्रक अधिकाऱ्यांनी पूरक मागण्या विधानमंडळाने संमत करताच घरभाडेभत्त्याच्या फरकाच्या मागणीवरील जानेवारी १९९० ते फेब्रुवारी १९९० पर्यन्तचा खर्च संबंधित कार्यात्मक प्रमुख लेखाशीर्षाखाली खर्ची टाकावा.

अनुदानप्राप्त संस्था व जिल्हा परिषदा ह्यांच्या कर्मचाऱ्यांच्या बाबतीतील खर्च, संबंधित प्रमुख लेखाशीर्षाखालील ज्या लेखाशीर्षाखाली त्यांच्या सहायक अनुदानाचा खर्च खर्ची घालण्यात येतो त्या उप लेखाशीर्षाखाली खर्ची घालण्यात यावा.

११. सर्व विभाग प्रमुख, जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी, कृषि व कृषीतर विद्यापीठांचे कुलसचिव यांनी या कारणास्तव होणारा अतिरिक्त खर्च मंजूर अनुदानातून भागवावा.

१२. या आदेशाची इंग्रजी प्रत सोबत जोडली आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

आ. क. शेटे,
शासनाचे उप सचिव.

प्रत

महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१, महाराष्ट्र, मुंबई.
महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-२, महाराष्ट्र, नागपूर.
महालेखापाल (लेखापरीक्षा)-१, महाराष्ट्र, मुंबई.
महालेखापाल (लेखापरीक्षा)-२, महाराष्ट्र, नागपूर
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई.
राज्यपालांचे सचिव,
मुख्य मंत्र्यांचे सचिव,
सर्व मंत्री आणि राज्यमंत्री यांचे स्वीय सहायक,
मंत्रालयीन सर्व विभाग,
सर्व विभागीय आयुक्त,
मंत्रालयाच्या सर्व विभागांखालील विभाग प्रमुख व कार्यालय प्रमुख,
* प्रबंधक, उच्च न्यायालय (मूळ शाखा), मुंबई.
* प्रबंधक, उच्च न्यायालय (अपील शाखा), मुंबई.
* सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई.
* सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
* प्रबंधक, लोक आयुक्त व उप लोक आयुक्त यांचे कार्यालय, मुंबई.
* महासंचालक, ऑल इंडिया इन्स्टिट्यूट ऑफ लोकल सेल्फ-गव्हर्नमेंट, मुंबई.
शिक्षण व सेवायोजन विभाग, मंत्रालय, मुंबई (२० प्रती).
ग्राम विकास विभाग, मंत्रालय, मुंबई (२० प्रती).
नगर विकास विभाग, गुडी-१०, मंत्रालय, मुंबई (२० प्रती).
कृषि व सहकार विभाग (२० प्रती).
आदिवासी विकास विभाग (२० प्रती).
सिनियर रिसर्च ऑफिसर, पे रिसर्च युनिट, भारत सरकार, वित्त मंत्रालय (व्यय विभाग), खोली क्रमांक २६१, नॉर्थ ब्लॉक, नवी दिल्ली.
संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई.
मुख्य लेखा परीक्षक, स्थानिक निधी हिशेब, मुंबई.
उप मुख्य लेखा परीक्षक, स्थानिक निधी हिशेब, मुंबई/पुणे/नागपूर/औरंगाबाद/नाशिक/अमरावती,
जिल्हा लेखापरीक्षा अधिकारी, स्थानिक निधी हिशेब, महात्मा फुले कृषि विद्यापीठ, राहुरी, जिल्हा अहमदनगर.
जिल्हा लेखापरीक्षा अधिकारी, स्थानिक निधी हिशेब, कोकण कृषि विद्यापीठ, दापोली, जिल्हा रत्नागिरी.
जनसंपर्क अधिकारी, मंत्रालय, मुंबई.
सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी,
सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य लेखा व वित्त अधिकारी,
शिक्षण संचालक, महाराष्ट्र राज्य, पुणे (२५ प्रती).
उच्च शिक्षण संचालक, महाराष्ट्र राज्य, पुणे (२५ प्रती).
कला संचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई (५० प्रती).
संचालक, तंत्रशिक्षण, महाराष्ट्र राज्य, मुंबई (१०० प्रती).
संचालक, तांत्रिक प्रशिक्षण, व्दारा - तंत्रशिक्षण संचालक, मुंबई (२५० प्रती).
सर्व विभागीय शिक्षण उप संचालक (प्रत्येकी १० प्रती).
सर्व विभागीय तंत्रशिक्षण उप संचालक (प्रत्येकी १० प्रती).
सर्व जिल्हा परिषदांचे शिक्षणाधिकारी.
आयुक्त, महानगरपालिका, नागपूर,
प्रशासकीय अधिकारी, पश्चिम महाराष्ट्रातील नगरपालिका शिक्षण मंडळे (पुणे/कोल्हापूर/सोलापूर या महानगरपालिकांची शिक्षण मंडळे वगळून),
मुख्य अधिकारी, सर्व नगरपालिका,
कार्यकारी अधिकारी, कॅन्टोनमेंट बोर्ड, खडकी/देहू-रोड/देवळाली/अहमदनगर,
सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,
संचालक, आदिवासी कल्याण, महाराष्ट्र राज्य, नाशिक (१० प्रती).
संचालक, समाजकल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे (१० प्रती).
संचालक, आदिवासी संशोधन व शिक्षण संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे,
आदिवासी विकास आयुक्त, नाशिक,
सर्व विभागीय समाजकल्याण अधिकारी,
अपर आयुक्त, आदिवासी उपयोजना, नाशिक/नागपूर,
सर्व समाजकल्याण अधिकारी, वर्ग-१,
सर्व आदिवासी कल्याण अधिकारी,
सर्व प्रकल्प अधिकारी, एकात्मिकृत आदिवासी विकास प्रकल्प,
कुलसचिव, महात्मा फुले कृषि विद्यापीठ, राहुरी, जिल्हा अहमदनगर,
कुलसचिव, मराठवाडा कृषि विद्यापीठ, परभणी,
कुलसचिव, पंजाबराव कृषि विद्यापीठ, अकोला,
कुलसचिव, कोकण कृषि विद्यापीठ, दापोली, जिल्हा रत्नागिरी,
कुलसचिव, मुंबई विद्यापीठ, मुंबई,
कुलसचिव, पुणे विद्यापीठ, पुणे,
कुलसचिव, नागपूर विद्यापीठ, नागपूर,
कुलसचिव, मराठवाडा विद्यापीठ, औरंगाबाद,
कुलसचिव, शिवाजी विद्यापीठ, कोल्हापूर,
कुलसचिव, अमरावती विद्यापीठ, अमरावती,
कुलसचिव, श्रीमती नाथीबाई दामोदर ठाकरसी महिला विद्यापीठ, मुंबई,
शिक्षण निरीक्षक, बृहन्मुंबई (उत्तर, दक्षिण व पश्चिम विभाग),
सर्व कन्याशाळा निरीक्षिका,
सर्व जिल्ह्यांचे वरिष्ठ लेखा परीक्षक (शिक्षण विभाग).
शिक्षण अधिकारी, बृहन्मुंबई महानगरपालिका,
संचालक, नगरपालिका प्रशासन, मुंबई,
सर्व प्रादेशिक संचालक, नगरपालिका प्रशासन,
वित्त विभागातील सर्व कार्यासने,
निवड फाईल, वित्त विभाग - सेवा-५.

---
* पत्राव्दारे.

Grant of House Rent Allowance to State Government employees and others.

GOVERNMENT OF MAHARASHTRA,
Finance Department,
Resolution No. घभाभ 1090/CR-10/SER-5,
Mantralaya, Bombay 400 032, dated 5th February 1990.

**READ:-**
(i) Government Resolution, Finance Department, No.CPA-1478/CR-251/SER-5, dated 17th April 1978.
(ii) Government Resolution, Finance Department, No.CPA-1480/CR-333/SER-5, dated 15th March 1980.
(iii) Government Resolution, Finance Department, No.RPS-1287/643/SER-10, dated 25th April 1988.

## R E S O L U T I O N

Government has sanctioned rates of House Rent Allowance to the Government employees and others with effect from 1st April 1988 under Government Resolution, Finance Department, No.RPS-1287/643/SER-10, dated the 25th April 1988. The demand that State Government employees and others may be granted House Rent Allowance on the lines of Central Government rates was under consideration of Government. Government has decided that the employees of the State Government, Zilla Parishads and Government aided institutions who are entitled for the House Rent Allowance as per existing Government orders, shall be granted House Rent Allowance at the rates similar to those of Central Government employees and from the dates mentioned in the Table under para 2 below.

2. Government is pleased to direct that the rates of House Rent Allowance admissible to the State Government employees should be revised according to the classification of cities mentioned in Annexure I-B under Government Resolution, Finance Department, No.RPS-1287/643/SER-10, dated 25th April 1988 and from the dates as shown below:-

TABLE

| Pay Range | Amount of House Rent Allowance per month, Class of Cities and the date from when effective | | |
|---|---|---|---|
| | "A", "B-1" and "B-2" Class, cities with effect from 1st October 1990 | Other District Headquarters and 'C' class cities, with effect from 1st April 1990 | Other places, with effect from 1st January 1990 |
| (1) | (2) | (3) | (4) |
| Rs. | Rs. | Rs. | Rs. |
| 750 - 949 | 150 | 70 | 30 |
| 950 -1499 | 250 | 120 | 50 |
| 1500 -2799 | 450 | 220 | 100 |
| 2800 -3599 | 600 | 300 | 150 |
| 3600 -4499 | 800 | 400 | 200 |
| 4500 and above | 1000 | 500 | 300 |

3. "Pay" for the purpose of these orders will be the pay as defined in Rule 9(36)(i) of Maharashtra Civil Services(Pay) Rules, 1981. The employees who are drawing pay in the unrevised pay scale, in their cases, while calculating the House Rent Allowance the total amount of pay in the unrevised scale as on 1st January 1986 and will also include dearness allowance and ad-hoc dearness allowance admissible on that pay as on 1st January 1986 (if admissible) and the amounts of first and second interim relief and ad-hoc increase of 20 percent (minimum Rs.75/-) (if they are still drawing) shall be taken into account.

> "NOTE:- In the case of Stagnation Increments and Ad-hoc Increments granted as per the revised pay scales in Maharashtra Civil Services (Revised Pay) Rules, 1988, they shall be treated as part of the basic pay, for the purposes of grant of House Rent Allowance and Compensatory Local Allowance".

4. House Rent Allowance at the above rates shall be payable to all employees(other than those residing in Government owned/hired accommodation)without requiring them to produce rent receipts. These employees shall, however, be required to furnish a certificate prescribed in Annexure II under Government Resolution, Finance Department, No.RPS-1287/643/SER-10, dated 25th April 1988, to the effect that they are incurring some expenditure on rent/contributing towards rent. House Rent Allowance shall also be paid to Government employees living in their own houses, subject to their furnishing a certificate as in Annexure II accompanying the said resolution. These certificates shall be produced by the employees in the month of April each year or whenever there is a change in the contents of the certificate. All other conditions at present applicable for grant of House Rent Allowance shall continue to apply. The conditions prescribed in respect of employees in the rural areas that of residing at the place of duty for eligibility of House Rent Allowance shall however, be dispensed with.

5. According to the orders cited at (ii) above, Government servants, who are eligible for rent-free quarters as a condition of service and to whom quarters are not provided are eligible to claim House Rent Allowance in lieu of rent-free quarters. Such Government servants will be eligible to draw House Rent Allowance in lieu of rent-free quarters on the basis of revised rates of house rent allowance plus 10 percent of their existing pay i.e. pay in the unrevised scale and compensatory local allowance, subject to fulfilment of conditions prescribed for claiming house rent allowance, in lieu of rent-free quarters.

6. Government is also pleased to direct that the revised rates of House Rent Allowance sanctioned in para 2 above shall be admissible together with the provisions contained in para 4 above, to full time teaching and non-teaching staff of primary, secondary schools of aided educational institutions and teaching and non-teaching staff of agricultural and non-agricultural universities and affiliated colleges and other employees mentioned in para 6 of Government Resolution, Finance Department, No. मवाम 1186/394/SER-10, dated 18th August 1986, if the present scheme of House Rent Allowance is applicable to them.

7. In exercise of the powers conferred by the proviso to Article 248 of the Maharashtra Zilla Parishad and Panchayat Samitis Act, 1961 (Mah.V of 1962) and all other powers enabling it in that behalf, Government is also pleased to direct that these orders should also be made applicable mutatis mutandis to the full-time Zilla Parishad employees.

8. Government is also pleased to direct that these orders should also be made applicable to the teaching and non-teaching staff drawing pay in the U.G.C. scales of pay.

9. The concerned Heads of Departments should bring these orders to the notice of local bodies and managements of institutions concerned and ensure that the employees are paid the House Rent Allowance at revised rates. They should inform the managements that the grant-in-aid for these allowances will be admissible in accordance with the rules for grant-in-aid sanctioned by Government from time to time.

10. The expenditure on account of difference between the existing
and revised rates of House Rent Allowance in respect of Government
servants should be debited to Contingency Fund Advance of Rs.54 lakhs
sanctioned under Government Memorandum, Finance Department, No. आकनि
1190/246/ अर्थसंकल्प -7, dated 3rd February 1990, "Demand No.G-8-2070,
Other Administrative Service-800, Other Expenditure-(vi) lumpsum
provision on account of revision of pay, house rent allowance and
compensatory local allowance." The Drawing and Disbursing Officers
should prepare a separate bill in respect of the difference between
the existing and new rates of house rent allowance debiting the
expenditure to the Contingency Fund Advance, and at the same time
indicate the final head of account to which the expenditure should
be debited on recoupment of advance. This procedure should be
followed till the drawal of monthly pay bills upto February 1990
(paid on or after 1st March 1990). Thereafter revised rates of
house rent allowance should be included in the monthly pay bills and
the same should be debited to the concerned functional major head
of account. The Controlling Officers should transfer the debit on
account of the difference of house rent allowance claimed from
January 1990 to February 1990 to the concerned functional major
head of account, as soon as the Supplementary Demands are passed by
the Legislature.

In respect of employees of aided institutions and Zilla Parishads, the expenditure should be debited to the sub-heads of accounts under the respective major heads to which expenditure on grant-in-aid to them is debited.

11. All Heads of Departments, Chief Executive Officers of Zilla Parishads and Registrars of Agricultural and non-agricultural Universities should meet this expenditure from the sanctioned grant-in-aid.

By order and in the name of the Governor of Maharashtra,

A.K. SHETE,
Deputy Secretary to Government.

---

H-1169(20,000+15-2-90)-4